**<u>ॲड.श्री.वैभव बगाडे,विशेष सरकारी अभियोक्ता यांना व्यावसायिक फी मंजूर करण्याबाबत.</u>**

निर्मलनगर पोलीस ठाणे, मुंबई येथील गु.नों. क्र.४२/२०१२ या गुन्ह्यामधून उद्भवणाऱ्या खटल्यामध्ये मा.सत्र न्यायालय,मुंबई येथील न्यायालयीन कामकाज पाहण्यासाठी.

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः एसपीपी-०३१७/प्र.क्र. ६०/पोल-१०**

२ रा मजला, मंत्रालय, हुतात्मा राजुगुरु चौक,

मादाम कामा रोड, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : १६ ऑक्टोबर, २०१८

<u>संदर्भ :-</u> **शासन अधिसुचना, विधि व न्याय विभाग क्र.एसपीपी-२०१७/यु.ओ.आर.३०/ डी- १४, दिनांक १६ जुन, २०१७.**

**शासन निर्णय:**

निर्मलनगर पोलीस ठाणे,मुंबई येथील गुन्हा नोंद क्र.४२/२०१२, या गुन्ह्यामधून उद्भवणाऱ्या प्रकरणात मा.सत्र न्यायालय,मुंबई येथे शासनाच्या वतीने कामकाज पाहण्यासाठी ॲड.श्री.वैभव बगाडे,विशेष सरकारी अभियोक्ता यांची विधि व न्याय विभागाने उपरोक्त दि.१६/०६/२०१७ च्या अधिसूचनेन्वये विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्ती केली आहे. सबब,प्रस्तुत प्रकरणी ॲड.श्री.वैभव बगाडे,विशेष सरकारी अभियोक्ता यांना विधि व न्याय विभागाच्या शासन निर्णय क्रमांक:मिटींग-२०११/ (२४९)/डी-१४, दि.१५/०२/२०१४ नुसार विहित केलेल्या शासकीय दराने व्यावसायिक फी अदा करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. परिणामकारक सुनावणीचे दिवस संबंधीत प्रकरणाच्या पर्यवेक्षीय पोलीस उपायुक्त दर्जाहून कमी नाही, अशा अधिकाऱ्याकडून प्रमाणित करुन घेण्यात यावेत व कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान होणार नाही,याची दक्षता घ्यावी. तसेच, प्रस्तुत प्रकरणी ॲड.श्री.वैभव बगाडे,विशेष सरकारी अभियोक्ता यांना अपरिणामकारक सुनावणी फी किंवा अन्य कोणत्याही प्रकारची फी वा भत्ता अनुज्ञेय असणार नाही.

३. यासाठी येणारा खर्च या विभागाच्या मागणी क्र. बी-१, २०५५ पोलीस - (००) १०८, राज्य मुख्यालय पोलीस (०२) (०१) शहर पोलीस आस्थापना - (२०५५ ००९७) - २८ व्यावसायिक सेवा या लेखाशिर्षाखालील त्या त्या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय विधि व न्याय विभागाच्या शासन निर्णय क्र.मिटिंग-२०११/(२४९)/डी-१४, दि.१५/०२/२०१४ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक क्र. २०१८१०१६१३०९३३२९२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kishor Shyamrao Bhalerao

Digitally signed by Kishor Shyamrao Bhalerao
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ce6f6edd7e1dfc6b4d6b65b7d93aa1a1dbcf0ec79c7c2143850ff6e8fdcb4c0d, serialNumber=94524ab889e2fa9e6bfe5e1e58426881bc36b968ffd0f45ce2d4bd3ff527ded2, cn=Kishor Shyamrao Bhalerao
Date: 2018.10.16 13:13:09 +05'30'

**( किशोर शामराव भालेराव )**
उप सचिव (विधि),गृह विभाग,
महाराष्ट्र शासन

प्रत**,**

१. पोलीस आयुक्त,बृहन्मुंबई.
२. सह पोलीस आयुक्त,आर्थिक गुन्हे,बृहन्मुंबई.
३. महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा)-१/२,महाराष्ट्र राज्य,मुंबई/नागपूर.
४. अधिदान व लेखाअधिकारी,मुंबई.
५. निवासी लेखापरीक्षा अधिकारी,मुंबई.
६. विधि व न्याय विभाग (का-१४), मंत्रालय, मुंबई.
७. वित्त विभाग (व्यय- ७), मंत्रालय, मुंबई.
८. ॲड.श्री.वैभव बगाडे, बी-३०५, समाजदीप को.ऑप.हॉ.सोसा.,एस.व्ही.रोड., कांदिवली (प.),मुंबई-४०० ०६७.
९. निवडनस्ती (पोल-१०).